वित्त विभागाच्या अधिपत्याखालील वस्तू व सेवाकर विभागातील गट-अ व गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना/ बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ ( १ ) ची पुन:स्थापना करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## वित्त विभाग
## शासन आदेश क्रमांकः विकवि-१०१८/प्र.क्र.१५९/वि.प्र.-१

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २० ऑक्टोबर, २०१८

**वाचा-**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही २०१४/प्र.क्र.२६/१२, दि.३१.०१.२०१४.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विकवि-१०१४/प्र.क्र.३८/वि.प्र.-१ दिनांक २७/०३/२०१४.
३) वित्त विभाग, शासन आदेश क्र. विकवि-१०१४/प्र.क्र.३८/वि.प्र.-१ दिनांक ०८/०३/२०१८.

## आदेश

वित्त विभागाच्या अधिपत्याखालील वस्तू व सेवाकर विभागातील (पूर्वीचा विक्रीकर विभाग) गट-अ व गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना/बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ (१) ची स्थापना वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विकवि १०१४/प्र.क्र.३८/वि.प्र.-१, दि.२७.०३.२०१४ अन्वये करण्यात आली होती. त्यामध्ये दिनांक ०८ मार्च, २०१८ च्या शासन आदेशान्वये सुधारणा करण्यात आली आहे. अपर मुख्य सचिव (वि.सु.) या पदावर सध्या प्रधान सचिवांची पदस्थापना झाली आहे. त्यानुसार आता दिनांक ०८ मार्च, २०१८ च्या शासन निर्णयान्वये स्थापन केलेल्या नागरी सेवा मंडळ (१) ची पुन:स्थापना खालीलप्रमाणे करण्यात येत आहे.

१) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव (वित्त) - अध्यक्ष
२) वस्तू व सेवाकर विभागाचा कार्यभार असलेले अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव - सदस्य
३) राज्यकर आयुक्त, वस्तु व सेवाकर विभाग - सदस्य

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२०१५१२३१३४०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Umakant Janardan Wakdikar

Digitally signed by Umakant Janardan Wakdikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=96ebf846a7ded5c290da0f3edc27decefa5c70f13c2b93007de5ba2d3344eca6, cn=Umakant Janardan Wakdikar
Date: 2018.10.20 15:21:26 +05'30'

**(उ.ज.वाकडीकर)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५. प्रधान सचिव (वित्तीय सुधारणा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. राज्यकर आयुक्त, वस्तू व सेवाकर विभाग, वस्तू व सेवाकर भवन, माझगांव, मुंबई.
७. विशेष राज्यकर आयुक्त, वस्तू व सेवाकर विभाग, वस्तू व सेवाकर भवन, माझगांव, मुंबई-१०
८. अवर सचिव (कार्या-१२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. कार्यासन विक्रीकर प्रशासन २,३,४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. निवडनस्ती